**विशेष लेखापरीक्षक सहकारी संस्था गट-अ या संवर्गातून सहनिबंधक सहकारी संस्था, (लेखापरीक्षण) गट-अ या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती व पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राजस २०१७/प्र.क्र.३/५-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ जुलै, २०१८

वाचा : १) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र. स.आ.-९ /कक्ष-१/स.नि.लेप/पदो/१५५३/२०१६, दि.१९/१२/२०१६
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.२८/०४/२०१५,दि.१६/०७/२०१५, व दि.१५ /६/२०१७,

**प्रस्तावना -**

विशेष लेखापरीक्षक वर्ग-१ या संवर्गातून सहनिबंधक, सहकारी संस्था गट-अ (लेखापरीक्षण) या संवर्गात तदर्थ पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील विशेष लेखापरीक्षक सहकारी संस्था गट-अ या संवर्गातून सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ (लेखापरीक्षण) या संवर्गात एकुण ५ अधिका-यांना सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरीक्षण) या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यास व संदर्भाधिन क्र.२ येथील नमूद अधिसूचनेतील तरतूदीनुसार विभाग वाटप करण्यास शासनाने मान्यता दिली आहे.

विशेष लेखापरीक्षक सहकारी संस्था, वर्ग-१ या संवर्गात कार्यरत असलेल्या खालील अधिकारी यांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे महसूली विभाग वाटप नियमावली २०१५, नुसार वाटप केलेल्या महसूली विभागात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी सहनिबंधक सहकारी संस्था, (लेखापरीक्षण) गट-अ या संवर्गात रु.१५६००-३९१००/- + ग्रेड पे रु.६६००/- या वेतन श्रेणीत निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकारी यांचे नाव व पदनाम | जेष्ठता क्रमांक | प्रवर्ग | वाटप केलेला महसुली विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.आर.सी.शाह, जिल्हा विशेष लेखा परिक्षक स.सं.,वर्ग-१ मुंबई | २ | खुला | नाशिक | विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था,(ले.प.) नाशिक विभाग नाशिक |
| २ | श्री.एच.ए.चव्हाण, विशेष लेखा परिक्षक, स.सं.वर्ग-१, अधिन विभागीय सह निबंधक (ले.प) कोल्हापुर विभाग,कोल्हापुर | ४ | खुला | अमरावती | विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था,(ले.प.) अमरावती विभाग अमरावती |
| ३ | श्री.आर.एस.शिर्के, विशेष लेखा परिक्षक,स.सं., वर्ग-१, (नागरी बँका), मुंबई. | ५ | खुला | कोकण -२ विभाग | सहनिबंधक , सहकारी संस्था (ले.प.) महाराष्ट्र स्टेट को-ऑप. हौसिंग फायनान्स कार्पोरेशन लि. मुंबई |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | श्री.आर.डी.बिर्ले, विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था, वर्ग-१, (साखर) लातूर | ६ | इ.मा.व | नागपूर विभाग | विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था,(ले.प.) नागपूर विभाग, नागपूर |
| ५ | श्री.बी.एच.बोडखे, जिल्हा विशेष लेखा परिक्षक स.सं.,वर्ग-१, पुणे | ७ | खुला | पुणे विभाग | सहनिबंधक, सहकारी संस्था (ले.प.) तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय लेखासमिती पुणे |

सदर पदोन्नती ही पुर्णपणे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात असून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहुन भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब यांनी दि.२९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या सुचनांनुसार आहे.

सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसुचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

पदोन्नती अधिका-यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतननिश्चिती संबंधीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक माहिन्याच्या आत दयावा अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१, मधील नियम (११) (०१) (ए) खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करावी.

सदर अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यापूर्वी सबंधित अधिका-यांकडून त्यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात आलेल्या पदावर पदोन्नतीचा हक्क राहणार नसल्याचे लेखी बंधपत्र सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट राज्य, पुणे यांनी घेवून तदनंतर रितसर कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात यावेत.

सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील असे पहावे व सदर अधिकारी विहित मुदतीत पदस्थापनेच्या जागी रुजू होतील याची दक्षता घ्यावी. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२/०६/२०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर केल्याची खातर जमा देखील करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१८०८०११५४०५१७१०२ असा आहे, हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

Sudin Gaikwad

Digitally signed by Sudin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing Tax Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=20315cd32e197cc2334676dbe1f09f90b2334eddf7e75d09609003b414273f73, cn=Sudin Gaikwad
Date: 2018.08.01 15:47:46 +05'30'

**(डॉ. सुदिन गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे
२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण व प्रशासन), व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था / सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था , व्दारा- सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

७. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता).

८. जिल्हा कोषागार अधिकारी,संबधित

९. संबधित अधिकारी व्दारा - सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे

१०. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

११. मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१२. मा.राज्यमंत्री (सहकार / पणन / वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.

१३. अपर मुख्य सचिव(सहकार) यांचे स्वीय सहायक

१४. अपर मुख्य सचिव (पणन) यांचे स्वीय सहायक.

१५. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक.

१६. निवड नस्ती (कार्यासन-५स).